महाराष्ट्र शिक्षण सेवा (शिक्षण सक्षमीकरण शाखा) संवर्गातील ज्येष्ठ अधिव्याख्याता व अधिव्याख्याता पदावरील अधिकाऱ्यांचा परिविक्षाधीन कालावधी पूर्ण करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः- पकास-२४१७/प्र.क्र.३०३/प्रशा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक - १५ ऑक्टोबर, २०१९

<u>वाचा</u> :- १ शा.शि. व क्री. वि.शासन निर्णय क्र. एसएटी-०८१२/प्र.क्र.३९८/प्रशा-२, दि.०१.०३.२०१३
२. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, अधिसूचना क्रमांक एसएओ-१०११/प्र.क्र.३९/प्रशा-२ दि. २६.०२.२०१८
३. आयुक्त शिक्षण यांचे पत्र क्र. आशिका/परिविक्षा २०१७/आस्था-अ/१०५/२२४५/ दि. १९.४.२०१८
४. आयुक्त शिक्षण यांचे पत्र क्र. आशिका/परिविक्षा २०१७/आस्था-अ/१०५/३०८२/ दिनांक १९.४.२०१८
५. आयुक्त शिक्षण यांचे पत्र क्र. आशिका/परिविक्षा/आस्थ-अ/१०५/६०८०, दिनांक १२.११.२०१८
६. आयुक्त शिक्षण यांचे पत्र क्र. आशिका/परिविक्षा/अधिव्या/आस्थ-अ/१०५/४२२८, दिनांक ०६.०७.२०१९

**<u>प्रस्तावना</u> :**

वाचा येथे अ.क्र.१ येथे नमूद दिनांक ०१.०३.२०१३ रोजीच्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र शिक्षण सेवा (प्रशिक्षण शाखा) संवर्गात ज्येष्ठ अधिव्याख्याता गट-अ या पदावर, सरळसेवेने महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत उमेदवारांची २ वर्षाच्या परिविक्षाधीन कालावधीसाठी नियुक्ती करण्यात आली आहे. महाराष्ट्र शिक्षण सेवा गट-अ व गट-ब (शिक्षण सक्षमीकरण शाखा-पूर्वीची शिक्षक प्रशिक्षण शाखा) या संवर्गात नियुक्त अधिकाऱ्यांसाठी विभागीय परीक्षा घेण्यात आली नाही. त्यामुळे या अधिकाऱ्यांच्या वेतनवाढी थांबलेल्या आहेत. परिणामी या सर्व अधिकाऱ्यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करणे, नियुक्त्या पुढे चालू ठेवणे, वेतनवाढी नियमित करणे, ज्येष्ठतासूची तयार करणे इत्यादी सेवाविषयक बाबीही प्रलंबित आहेत. आयुक्त (शिक्षण) यांच्या दिनांक १९.०४.२०१८ च्या पत्रान्वये परिविक्षाधीन कालावधी पूर्ण करण्याचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे.

२. शालेय शिक्षण व क्रीडा विभागाच्या दिनांक २६.०२.२०१८ रोजीच्या अधिसूचनेद्वारे “महाराष्ट्र शिक्षण सेवा (शिक्षण सक्षमीकरण शाखा)” संवर्गातील प्राचार्य गट-अ, ज्येष्ठ अधिव्याख्याता गट-अ व अधिव्याख्याता गट-ब या पदांसाठी विभागीय परीक्षेचे विनियमन करणारे नियम २०१८ प्रसिध्द करण्यात आले आहेत.

**शासन निर्णय** :

शालेय शिक्षण व क्रीडा विभागाच्या दिनांक २६.०२.२०१८ रोजीच्या अधिसूचनेद्वारे “महाराष्ट्र शिक्षण सेवा (शिक्षण सक्षमीकरण शाखा)” संवर्गातील प्राचार्य गट-अ, ज्येष्ठ अधिव्याख्यता गट-अ व अधिव्याख्याता गट-ब या पदांसाठी विभागीय परीक्षेचे विनियमन करणारे नियम २०१८ प्रसिध्द करण्यात आले आहेत. सदर नियमातील तरतुदी विचारात घेता, सरळसेवेने दिनांक ०१.०३.२०१३ रोजीच्या शासननिर्णयान्वये नियुक्त झालेल्या अधिकाऱ्यांपैकी २ अधिकाऱ्यांचा परिविक्षाधीन कालावधी नियमित स्वरुपात संपुष्टात आणण्याचा निर्णय शासनाने घेता आहे. महाराष्ट्र शिक्षण सेवा (प्रशिक्षण शाखा) संवर्गात ज्येष्ठ अधिव्याख्याता व अधिव्याख्याता पदावर नियुक्त सोबतच्या प्रपत्र-अ मध्ये नमूद अधिकाऱ्यांचा त्यांच्या नावासमोर रकाना क्र. ७ मध्ये नमूद दिनांकास परिविक्षाधीन कालावधी पूर्ण करण्यात येत असून रकाना क्र. ८ मध्ये नमूद दिनांकास त्यांची सेवा पुढे चालू ठेवण्यास शासन मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

२. परिविक्षाधीन पूर्ण करणाऱ्या अधिकाऱ्यांना दिनांक २६.०२.२०१८ रोजीच्या नियमांच्या अधिन राहून वार्षिक वेतनवाढी देण्यात याव्यात. तसेच संबंधितांच्या सेवापुस्तकात याची नोंद घेण्यात यावी.

३. “महाराष्ट्र शिक्षण सेवेतील प्राचार्य (गट-अ), ज्येष्ठ अधिव्याख्याता (गट-अ) व अधिव्याख्याता (गट-ब) ( शिक्षण सक्षमीकरण शाखा) या पदांसाठी विभागीय परीक्षा नियम २०१८” हे नियम दिनांक २६.०२.२०१८ रोजी निर्गमित करण्यात आले असून, दिनांक २७.०२.२०१८ रोजीच्या राजपत्रात प्रसिध्द करण्यात आले आहेत. सदर अधिसूचनेमधील नियम ३(१) नुसार नियमित स्वरुपात परिविक्षाधीन कालावधी पूर्ण करण्यात आलेल्या अधिकाऱ्यांची (ज्यांना वयाची ५५ वर्षे पूर्ण झाल्यामुळे सूट देण्यात आली आहे, असे अधिकारी वगळून ) विभागीय परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१०१५१५२३५३८५२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Santosh Basaveshwar Mamadapure

Digitally signed by Santosh Basaveshwar Mamadapure
DN: CN = Santosh Basaveshwar Mamadapure, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = School Education and Sports
Date: 2019.10.15 15:25:00 +05'30'

**( संतोष ममदापुरे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
२) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, ५१/२, ७ व ८ वा मजला, कुपरेज टेलिफोन निगम इमारत, महर्षि कर्वे मार्ग, कुपरेज, मुंबई ४०० ०२१. ( पत्राद्वारे )
३) संचालक, महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, पुणे (विद्या प्राधिकरण)
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
५) प्राचार्य/उपसंचालक, प्रादेशिक विद्या प्राधिकरणे.
६) संबंधित प्राचार्य, जिल्हा शैक्षणिक सात्तत्यपूर्ण व्यावसायिक विकास संस्था.
७) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
८) संबंधित अधिकारी ( संचालक, म.रा.शै.सं.व प्र.प.( विद्या प्राधिकरण) पुणे यांचे कार्यालया मार्फत)
९) निवडनस्ती.

शालेय शिक्षण व क्रीडा विभाग शासन निर्णय क्रमांक पकास-२४१७/प्र.क्र.३०३/प्रशा-२, दिनांक १५.१०.२०१९ सोबतचे प्रपत्र

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नांव | शासन सेवेत नियुक्तीच्या आदेशाचा दिनांक | शासन सेवेत प्रथम रुजू झाल्याचा दिनांक | रकाना ४ मधील दिनांकानुसार परिविक्षाधीन कालावधी पूर्ण होण्याचा दिनांक | परिविक्षा कालावधीत घेतलेल्या एकूण अर्जित/परिवर्तीत रजा इ. एकूण कालावधी | रकाना ६ मधील कारणांमुळे वाढलेला परिविक्षाधीन कालावधी पूर्ण होण्याचा दिनांक | परिविक्षाधीन कालावधी समाधानकारक पूर्ण केल्यामुळे शासन सेवा ज्या दिनांकापासून पुढे चालु ठेवावयाची आहे तो दिनांक. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| १ | विक्रम शेषराव सारुक, | शा.शि.व क्री.वि. शा.नि.क्र.एसएटी-०८१२/प्र.क्र.३९८/ प्रशा-२, दि.०१.०३.२०१३ | ०४.०३.२०१३ | ०३.०३.२०१५ | -- | ०३.०३.२०१५ | ०४.०३.२०१५ |
| २. | श्री. प्रभाकर नागनाथ क्षीरसागर | शा.शि.व क्री.वि. शा.नि.क्र.एसएटी-०८१२/प्र.क्र.३९८/ प्रशा-२, दि.०१.०३.२०१३ | २५.०६.२०१३ | २४.०६.२०१५ | -- | २४.६.२०१५ | २५.०६.२०१५ |

Santosh Basaveshwar Mamadapure

Digitally signed by Santosh Basaveshwar Mamadapure
DN: CN = Santosh Basaveshwar Mamadapure, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = School Education and Sports
Date: 2019.10.15 15:25:28 +05'30'

**( संतोष ममदापुरे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.